**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांक: संकीर्ण-२०१७/प्र.क्र. ७६/१४**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०१ जून, २०१७

संदर्भ-१.महिला व बाल विकास विभागाचे आदेश क्र.मबाआ-२०१५/प्र.क्र.१५१(भाग-१)/का-७, दि.१७.०४.२०१७
२. कार्यालय महिला व बालकल्याण विभाग, जिल्हा परिषद, गोंदिया यांचे आदेश क्र.जिपगों/मवबाकवि वस/वशि/डे-३/५९४/२०१७,दि.०३.०५.२०१७.

**शासन आदेश**

श्री.ज.म.अंबादे, अवर सचिव यांची उप मुख्य कार्यकारी अधिकारी(बालकल्याण), जिल्हा परिषद, गोंदिया या पदावरील प्रतिनियुक्ती महिला व बाल विकास विभागाच्या संदर्भिय क्र.१ च्या आदेशान्वये, दि.१७.०४.२०१७ (म.नं.) रोजी संपुष्टात आली असून, त्यांच्या सेवा सामान्य प्रशासन विभागाकडे प्रत्यावर्तित करण्यात आल्या आहेत. त्यानुषंगाने, महिला व बालकल्याण विभाग, जिल्हा परिषद, गोंदिया कार्यालयाच्या संदर्भिय क्र.२ च्या आदेशान्वये श्री.ज.म.अंबादे, अवर सचिव यांना सदर प्रतिनियुक्तीच्या पदावरुन दि.०३.०५.२०१७ (म.नं.)पासून कार्यमुक्त करण्यात आले असून, श्री.ज.म.अंबादे, अवर सचिव हे दि.०६.०५.२०१७ (म.पू.)रोजी सामान्य प्रशासन विभागात रुजू झाले आहेत.

२. श्री. ज.म.अंबादे, अवर सचिव यांची प्रत्यावर्तनानंतरची पदस्थापना अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागातील रिक्त असलेल्या अवर सचिव पदावर करण्यात येत आहे. श्री. ज.म.अंबादे, अवर सचिव यांनी तात्काळ अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागात रुजू व्हावे.

३. श्री.ज.म.अंबादे, अवर सचिव यांचा दि. ०६.०५.२०१७ ते दि. ०१.०६.२०१७ पर्यंतचा कालावधी सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी मंजूर करण्यास सामान्य प्रशासन विभागाची मान्यता देण्यात येत आहे. सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी मंजूर करण्याची कार्यवाही म.ना.से.(सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम १९८१ च्या नियम ९(१४)(एफ) नुसार, व शासन निर्णय, वित्त विभाग, दि.०२.०६.२००३ मधील तरतुदीनुसार अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाने करावी.

४. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६०११७२५५६६५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Andhra Pradesh, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2017.06.01 17:27:47 +05'30'

(ग.भि.गुरव)
अवर सचिव महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. अ.मु.स. (सेवा), सा.प्र.वि.,
४. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सामान्य प्रशासन विभाग,
५. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
६. सह/उप सचिव/(आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग/ अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
८. श्री. ज.म.अंबादे, अवर सचिव,
९. कार्यासन १४, निवड नस्ती.